**राज्यातील आदिवासी उच्च माध्यमिक आश्रमशाळांमध्ये विज्ञान शाखेसाठी मंजूर अतिरिक्त विषय शिक्षकाचे एक पद भरतीस मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. अआशा.२०२१/प्र.क्र.९८/का.११**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक:-०७ जुलै, २०२३

**वाचा**:- १. शासन निर्णय क्र. अआशा.२०१९/प्र.क्र.१४८/का.११, दिनांक २० सप्टेंबर, २०१९
२. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.अनुआशा.२०२३/प्र.क्र.८४/का.७ (१)/३८९१, दिनांक ०२.०६.२०२३.
३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.अनुआशा.२०२३/प्र.क्र.८४/का.७ (१)/४४१८, दिनांक २७.०६.२०२३.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्यातील डोंगराळ व दुर्गम भागातील सामाजिक/शैक्षणिकदृष्ट्या मागासलेल्या आदिवासी जनतेच्या सर्वांगीण प्रगतीसाठी क्षेत्र विकासाचा दृष्टीकोन स्विकारण्यात आला आहे. या कार्यक्रमांतर्गत आदिवासी क्षेत्रात शिक्षणाचा प्रसार व्हावा या हेतूने शासनाने सन १९७२-७३ पासून "आश्रमशाळा समूह" योजना सुरु केली. या योजनेंतर्गत आदिवासी विद्यार्थ्यांना माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण घेण्याच्या दृष्टीने आणि त्यांना समाजाच्या मुख्य प्रवाहात आणण्यासाठी आदिवासी विकास विभागांतर्गत ५०२ शासकीय आश्रमशाळा व ५५६ अनुदानित आश्रमशाळा चालविण्यात येत आहेत. सदर आश्रमशाळांमध्ये इयत्ता १ ली ते १२ वी पर्यंतचे शिक्षण विद्यार्थ्यांना मोफत देण्यात येत आहे.

२. राज्यामध्ये ५०२ शासकीय व ५५६ अनुदानित आश्रमशाळा चालविण्यात येत असल्या तरी सद्यस्थितीत १२१ शासकीय व १५४ अनुदानित आश्रमशाळांमध्ये उच्च माध्यमिकचे (इयत्ता ११ वी व १२ वी) विज्ञान व कला शाखेचे वर्ग चालविण्यात येत आहेत. त्यापैकी मा. मंत्रिमंडळाने दिनांक ०१ नोव्हेंबर, २०१८ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेनुसार १० शासकीय व ११ अनुदानित आश्रमशाळांना अनुक्रमे शासन निर्णय दिनांक २७ नोव्हेंबर, २०१८ व दिनांक ०६ जून, २०१९ अन्वये मंजूरी देण्यात आलेली असून सदर आश्रमशाळांना उच्च माध्यमिकची ८ पदे (४ पदे कला शाखेकरीता व ४ पदे विज्ञान शाखेकरीता) मंजूर करण्यात आलेली आहेत.

३. तथापि, त्यापूर्वी कार्यरत असलेल्या शासकीय व अनुदानित आश्रमशाळांसाठी आदिवासी विकास विभागाने ठरवून दिलेल्या आकृतीबंधानुसार उच्च माध्यमिक आश्रमशाळांमध्ये कला शाखेसाठी ४ व विज्ञान शाखेसाठी ३ अशी शिक्षकांची पदे मंजूर आहेत. विज्ञान शाखेमध्ये इयत्ता ११ वी व १२ वी या वर्गामध्ये प्रामुख्याने गणित, भौतिकशास्त्र, जीवशास्त्र व रसायनशास्त्र हे विषय शिकवले जातात. सदर सर्व विषयांसाठी स्वतंत्र शिक्षकांची आवश्यकता आहे. तथापि, आदिवासी विकास विभागांतर्गत आश्रमशाळांमध्ये विज्ञान शाखेसाठी एक शिक्षक कमी असल्यामुळे भौतीकशास्त्र व रसायनशास्त्र किंवा भौतीकशास्त्र व गणित हे विषय एकाच शिक्षकाला शिकवावे लागतात. सध्या विज्ञान शाखेसाठी नियुक्त केलेल्या तीन शिक्षकापैकी एका शिक्षकाची पदव्युत्तर पदवी (post-Graduation) ही केवळ भौतीकशास्त्र किंवा रसायनशास्त्र यापैकी एका विषयातील असल्याने विज्ञान शाखेतील विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक गुणवत्तेवर व पुढील शिक्षणावर विपरीत परिणाम होतो. तसेच या विद्यार्थ्यांना अभियांत्रिकी/वैद्यकीय शिक्षणासाठी प्रवेश मिळण्यामध्ये अडचण येते. या सर्व बाबींचा विचार करुन आदिवासी विकास विभागांतर्गत अनुदानित उच्च माध्यमिक आश्रमशाळांमधील ज्या

आश्रमशाळांमध्ये विज्ञान शाखा सुरु आहे. अशा आश्रमशाळांमधील विज्ञान विषयाच्या शिक्षकाचे एक पद दिनांक २० सप्टेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आले आहे. सदर शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात आलेल्या उच्च माध्यमिक शिक्षकांची नियुक्ती अनुदानित आश्रमशाळांशी संलग्न कनिष्ठ महाविद्यालयामध्ये करताना अतिरिक्त उच्च माध्यमिक शिक्षकाचे पद मंजूरीसाठी संबंधित आश्रमशाळेतील उच्च माध्यमिकची विद्यार्थी संख्या व शाळेची प्रतवारी नमूद करुन अपर आयुक्त निहाय प्रस्ताव शासनास सादर करण्याबाबत तरतूद आहे.

४. शासन निर्णयातील तरतूदीनुसार संदर्भाधीन क्र.२ च्या पत्रान्वये आयुक्त, आदिवासी विकास यांच्या दिनांक २१ मार्च, २०२३ व दिनांक १३ एप्रिल, २०२३ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावांच्या अनुषंगाने अनुदानित आश्रमशाळेशी संलग्न कनिष्ठ महाविद्यालयातील विज्ञान शाखेसाठी दिनांक २० सप्टेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले १ अतिरिक्त पद भरण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्यात आदिवासी विकास विभागांतर्गत ५५६ अनुदानित आश्रमशाळा चालविण्यात येत आहेत. सदर आश्रमशाळांपैकी १५४ अनुदानित आश्रमशाळांमध्ये उच्च माध्यमिकचे (इयत्ता ११ वी व इयत्ता १२ वी ) कला व विज्ञान शाखेचे वर्ग चालविण्यात येत आहेत. सदर आश्रमशाळांपैकी मा. मंत्रिमंडळाने दिनांक ०१, नोव्हेंबर, २०१८ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेनुसार ११ अनुदानित माध्यमिक आश्रमशाळांना शासन निर्णय दिनांक ०६ जून, २०१९ अन्वये श्रेणीवाढ देऊन इयत्ता ११ वी व इयत्ता १२ वी चे (कला व विज्ञान शाखा) चालविण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे. सदर आश्रमशाळा वगळून उर्वरित सर्व शासकीय व अनुदानित उच्च माध्यमिक आश्रमशाळांसाठी पूर्वी मंजूर केलेल्या कला शाखेकरीता ४ व विज्ञान शाखेकरीता ३ पदाव्यतिरिक्त विज्ञान विषयाच्या शिक्षकाचे १ अतिरिक्त पद भरण्यास दिनांक २० सप्टेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे.

२. शासन निर्णय दिनांक २० सप्टेंबर, २०१९ मधील परिच्छेद क्र.३ येथील नमूद तरतूदीनुसार राज्यातील स्वंयसेवी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या अनुदानित आश्रमशाळेशी संलग्न कनिष्ठ महाविद्यालयातील विज्ञान शाखेचे मंजूर १ अतिरिक्त विषयाचे पद भरण्याबाबत आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी दिनांक ०२ जून, २०२३ व २७ जून, २०२३ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने **परिशिष्ट-अ** येथे नमूद अनुदानित आश्रमशाळेशी संलग्न पात्र सात कनिष्ठ महाविद्यालयांना विज्ञान शाखेकरीता ३ पदाव्यतिरिक्त विज्ञान शाखेचे मंजूर १ अतिरिक्त पद भरण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

अ) अपर आयुक्त यांनी पद भरती मान्यता देताना आदिवासी विकास विभागांतर्गत स्वंयसेवी संस्थाकडून चालविल्या जाणाऱ्या अनुदानित आश्रमशाळांमधील अतिरिक्त ठरलेल्या शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या समावेशनाबाबतची कार्यपध्दती संदर्भातील दिनांक ११ जून, २०१९ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदींची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

ब) आयुक्त, आदिवासी विकास नाशिक यांचेशी संपर्क साधुन राज्यातील अनुदानित आश्रमशाळांशी संलग्न कनिष्ठ महाविद्यालयातील विज्ञान शाखेचे अतिरिक्त ठरलेले कोणतेही शिक्षक समायोजनासाठी शिल्लक नाहीत अशा प्रकारचे त्यांचे ना-हरकत प्रमाणपत्र घेऊनच शिक्षकांच्या नियुक्तीस मान्यता देण्यात यावी.

४. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी उपरोक्त बाबत आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करावी. उपरोक्त बाबीवर होणार खर्च शासकीय व अनुदानित आश्रमशाळांच्या संबंधित अर्थसंकल्पिय लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व वेळोवेळी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७०७१८३३४०८४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UDAY GANPAT GAWAS

Digitally signed by UDAY GANPAT GAWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d99ad92d2ef92f97f483127c546b50d831cbc0858b00a86d17202dbe2e19d646, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9CE356F38C6A70A8FFDE299AD6627F48BD01E875A7ACA38BD139B0CC5367E62D, cn=UDAY GANPAT GAWAS
Date: 2023.07.12 17:39:44 +05'30'

**(उदय ग. गवस)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मा. विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७. मा. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
८. मा. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. मा.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन मुंबई.
११. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
१२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती
१३. जिल्हाधिकारी, यवतमाळ/नांदेड/अमरावती
१४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पांढरकवडा/किनवट/धारणी
१५. संचालक, प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. संचालक, माध्यमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१७. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१८. सदस्य सचिव तथा राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, जवाहर बाल भवन, नेताजी सुभाषचंद्र मार्ग, चर्नी रोड, मुंबई-४०० ००४.
१९. संचालक, सर्व शिक्षण अभियान संचालनालय, महाराष्ट्र राज्य, चर्नीरोड, मुंबई.
२०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर.
२१. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर
२२. संचालक, लेखा व कोषागरे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२३. जिल्हा कोषागार अधिकार, यवतमाळ/नांदेड/अमरावती
२४. निवडनस्ती (का.११)

शासन निर्णय क्र.अआशा.२०२१/प्र.क्र.९८/का.११, दिनांक ०७ जुलै, २०२३ सोबतचे

परिशिष्ट-अ

| अ.क्र. | अ.आ. प्र.का. | अनुदानित आश्रमशाळेचे नाव | इ ११.वी विद्यार्थी संख्या | इ १२.वी विद्यार्थी संख्या | अनुदानित आश्रमशाळेची प्रतवारी | | | यापूर्वीचे मंजूर पदे | या शासन निर्णयान्वये विज्ञान शाखेसाठी मंजूर केलेले पद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | सन २०१७-२०१८ | सन २०१८-२०१९ | सन २०१९-२०२० | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | अमरावती किनवट | उनकेश्वर, ता. किनवट, जि. नांदेड | ४१ | ३५ | ब | ब | ब | ३ | १ |
| २ | अमरावती किनवट | साळवाडी, ता. भोकर, जि. नांदेड | ५४ | ४० | ब | ब | ब | ३ | १ |
| ३ | अमरावती धारणी | बहिराम कारंजा, ता. चांदुर, जि. अमरावती | ५५ | ३६ | ब | ब | ब | ३ | १ |
| ४ | अमरावती पांढरकवडा | खटेश्वर, ता.कळंब, जि. यवतमाळ | ५२ | ५३ | ब | ब | ब | ३ | १ |
| ५ | अमरावती पांढरकवडा | सावरखेडा, ता. राळेगाव, जि. यवतमाळ | ५७ | ४८ | ब | ब | ब | ३ | १ |
| ६ | अमरावती पांढरकवडा | खैरगाव कासार, ता. राळेगाव, जि. यवतमाळ | ५० | ४२ | ब | ब | ब | ३ | १ |
| ७ | अमरावती पांढरकवडा | धानोरा (वड) ता. यवतमाळ, जि. यवतमाळ | ५६ | ५८ | ब | ब | ब | ३ | १ |